**पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर सोलापूर विद्यापीठ येथे पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर यांचे स्मारक तसेच टॉवरचे बांधकाम करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : स्मारक-२०२१/प्र.क्र.२२/विशि-२**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०७ डिसेंबर, २०२१.

**संदर्भ :-** १. विभागाचा समक्रमाकांचा शासन निर्णय दि.२३.०८.२०२१.
२. संचालक, उच्च शिक्षण महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे दि.०६.१२.२०२१.
३. शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दि.२०.०९.२०१९.

**प्रस्तावना :-**

पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर यांचे देशाच्या इतिहासामध्ये एक उत्तम प्रशासक, पराक्रमी सेनानी, न्यायप्रिय व्यक्ती, त्याचबरोबर असंख्य जनकल्याणकारी कार्य करणारी लोकमाता म्हणून पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर यांची ओळख आहे. अशा या थोर स्त्रीरत्नांचे नाव सोलापूर विद्यापीठास देण्यात आले आहे.

सद्यस्थितीत विद्यापीठाच्या कोंडी ता.उत्तर सोलापूर या परिसरात पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर यांचे स्मारक उभारणी करण्यासंदर्भात लोकप्रतिनिधींकडून तसेच जिल्ह्यातील स्थानिक सामाजिक संघटना व विविध घटकाकडून विद्यापीठाकडे मागणी होत असल्याने संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर यांचे स्मारक उभारणी करण्यासंदर्भात समिती गठित करण्यात आली होती. मा.उपमुख्यमंत्री व सदर समिती सदस्यासमोर झालेल्या सादरीकरणाच्या अनुषंगाने सोलापूर विद्यापीठाच्या परिसरात पूण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर यांच्या स्मारकासाठी चबूतरा बांधकाम, लॅन्डस्केप व सुशोभीकरण तसेच टॉवर बांधकामाच्या रु.१४,२४,९२,२३८/- इतक्या किमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये विनंती कली होती.

सदर स्मारक व टॉवरच्या बांधकामाची किंमत रु.१५ कोटीच्या मर्यादित असल्याने संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारानुसार पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर सोलापूर विद्यापीठ येथे पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर यांचे स्मारक तसेच टॉवरचे बांधकाम करण्याकरीता अनुक्रमे रु.९,६९,८१,०५४/- व रु.४,५५,११,१८४/- किंमतीचे अंदाजपत्रकास (Recapitulation Sheet) मुख्य अभियंता, पुणे यांनी तांत्रिक सहमती दिल्यानुसार सदर दोन्ही बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

पण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर सोलापूर विद्यापीठ येथे पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर यांचे स्मारक तसेच टॉवरचे बांधकाम करण्यास अनुक्रमे रु.९,६९,८१,०५४/- व रु.४,५५,११,१८४/- किंमतीचे अंदाजपत्रकास (Recapitulation Sheet) मुख्य अभियंता, पुणे यांनी सहमती दर्शविल्यानुसार खालील अटीं

व शर्तीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

१. विद्यापीठाच्या प्राधिकरणाची आवश्यक ती मान्यता घेण्यात यावी.

२. ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

३. प्रस्तुत काम पुरात्तव विभागाच्या अखत्यारित येत असल्यास संबंधित विभागाची तसेच महानगरपालिका व तत्सम प्राधिकरणे यांची पूर्व परवानगी घ्यावी.

४. तांत्रिक मंजूरी देताना राज्य दरसूचीबाह्य बाबीच्या दराकरिता शासन परिपत्रक क्रमांक. २०१७/प्र.क्र.११/नियोजन-३, दि.११.०४.२०१७ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

५. प्रस्तावातील खरेदीशी संबंधीत बाबींकरिता ई-निविदा प्रणालीचा अवलंब करून उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाकडील दि.२४.०८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या सूचना विचारात घ्याव्यात.

६. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दि.१०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

७. स्थापत्य कामाच्या कालावधीतच विद्युतीकरणाबाबत तसेच इतर अनुषंगिक कामांचे योग्य नियोजन करून सदर कामे पूर्ण करावीत.

८. इमारतीमध्ये दिव्यांगाकरिता उपलब्ध करून द्यावयाच्या विविध सोयींबाबत शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यात यावी.

९. विषयांकित कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही. याद्दष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

२. हा शासन निर्णय, वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दि.२०.०९.२०१९ तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक-संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दि.२५ सप्टेंबर, २०१९ अन्वये प्रशासकीय विभागास दिलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११२०७१७०५२८५८०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=HIGHER AND TECHNICAL DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=880d8eb755bcb4455fa360baaa8797820b6265d75275a72f9fa31977bfeff4c9, serialNumber=99eb928028df71ebdfcd2898e209d499192ad3899261fead42f7d38a3141ab69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2021.12.07 17:09:59 +05'30'

**(अ. म. बाविस्कर)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल तथा कुलपती यांचे उपसचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. कुलगुरु, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर, सोलापूर विद्यापीठ, सोलापूर.
५. कुलसचिव, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर, सोलापूर विद्यापीठ, सोलापूर.
६. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, सोलापूर.
८. मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा.राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०. प्रधान सचिव (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
११. प्रधान सचिव (व्यय) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१२. उप सचिव (विशि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.